**आस्थापना**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील ३० अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय, क्र एमईसी-०३०२/प्र.क्र.२९/पोल-७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: २६ मार्च,२००२.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.एमईसी- १२००/१०९२/ प्र.क्र.३७/ पोल-७, दिनांक २९.१.२००२.

२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र क्र पोआ/ कक्ष-२/मुवा/६७/२००२/ (रचना व कार्यपध्दती शाखा), दिनांक: १८.२.२००२.

**शासन निर्णय:-** पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील ३० अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक १ येथे नमूद शासन निर्णय समक्रमांक दि. २९.१.२००२ अन्वये दि. १.१.२००२ पासून दिनांक २८.२.२००२ पर्यत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता सदरहू ३० अस्थायी पदांना दिनांक १.३.२००२ पासून दि.३०.४.२००२ पर्यत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देत आहे. ही मुदतवाढ जी पदे शासनाने काही ठराविक कालमर्यादेपर्यत मुदतवाढ देऊन नष्ट करण्याचे आदेश दिलेले आहेत किंवा वित्त विभागाने तसे सूचित केले आहे अशी पदे आणि सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त असलेली पदं यांना लागू होणार नाही.

२. यासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष "२०५५-पोलीस-१०८-राज्य मुख्यालय पोलीस १०८ (दोन) (१) शहर पोलीस" आणि "२०५५-पोलीस-१०८ राज्य मुख्यालय पोलीस-१०८ (पाच) रुग्णालयीन खर्च बृहन्मुंबईतील पोलीस रुग्णालये" आणि "२०५५-पोलीस-१०८ राज्य मुख्यालय पोलीस-१०८(एक) पोलीस आयुक्तांचे कार्यालय, बृहन्मुंबई" खाली खर्ची टाकून तो सन २००२-२००३ च्या मंजूर अनुदानातून भागवावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर:५३८/२००२/व्यय-७,दिनांक २२.३.२००२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ब.बा.चव्हाण )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.